राज्यस्तरावर "चॅम्पियन पोर्टलकरिता" नोडल अधिका-याची" नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.१६९/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १६ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ** :- संयुक्त सचिव,सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. D.O.No.५ (३)/२०२०-२१/MSME CHAMPIONS' Desk/General, दि. २७/०७/२०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मा. पंतप्रधान यांच्याद्वारे दि. ०१/०६/२०२० रोजी औपचारीकपणे सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील तक्रारीचे निराकरण करण्यासाठी "चॅम्पियन पोर्टल" सुरु करण्यात आले आहे, असे संदर्भाधिन पत्रान्वये कळविले आहे.

"चॅम्पियन पोर्टल" हे एक सशक्त, एकात्मिक, मजबूत, एकत्रित आणि तंत्रज्ञानाद्वारे चालविले जाणारे व्यासपीठ असून या पोर्टलद्वारे केवळ सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील तक्रारीचे निराकरण करण्यात येणार नसून देशातील सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील उद्योगांना प्रोत्साहन देखील देण्यात येणार आहे.

यानुषंगाने राज्यातील सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील तक्रारीचे निराकरण करण्यासाठी "चॅम्पियन पोर्टलवर" राज्यस्तरावर "नोडल अधिकारी" नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

राज्यातील सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील योजना "चॅम्पियन पोर्टलवर" अपलोड करण्यासाठी आणि सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रातील तक्रारीचे व स्टार्ट- अप योजना संबंधित मुद्दयांचे निराकरण करण्यासाठी राज्यस्तरावर "नोडल अधिकारी" म्हणून, "व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई" यांची नेमणूक करण्यात येत आहे. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन सूचनेनुसार राज्यातील सर्व सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम क्षेत्रांशी समन्वय करुन केंद्र शासनाच्या सुचनेनुसारआवश्यक कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत दर ३ महिन्याला शासनास प्रगतीदर्शक अहवाल द्यावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९१७१२५४३२८५१० असा आहे. शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2020.09.17 12:59:32 +05'30'

**(संजय देगांवकर)**

**सह सचिव(उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत,मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई
४. सह सचिव (उद्योग-७) यांचे स्वीय सहाय्यक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सह संचालक (उद्योग), उद्योग संचालनालय यांची विभागीय कार्यालये
६. निवड नस्ती (उद्योग-७).